(वितरण आदेश क्रमांक-८)

सन २०१८-२०१९ या वर्षासाठी दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDU-GKY) आदिवासी घटक कार्यक्रम (TSP) प्रवर्गासाठी निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१८/प्र.क्र.१५४/योजना-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा</u> :- १) केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.जे-१७०२५/०१/२०१५ DDU-GKY-११C, दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ चे वितरण आदेश.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१८/प्र.क्र.२३/कार्यासन-६, दिनांक २ नोव्हेंबर, २०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्र शासनाने सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना आदिवासी घटक कार्यक्रम (TSP) केंद्र हिस्सा या योजनेकरिता पहिला हप्ता म्हणून रु.१११८.६७ लाख इतका निधी वितरीत केलेला आहे. राज्याच्या एकत्रित निधीमध्ये सदर निधी जमा झालेला आहे. त्यामुळे सदर केंद्र हिस्सा रु.१११८.६७ लाख, व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.७४५.७८ लाख असा एकूण रु. १८६४.४५ लाख इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-२०१९ मध्ये दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रम (TSP) केंद्र हिस्सा (२५०१ २९५३) करिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.१११८.६७ लाख (रुपये अकरा कोटी अठरा लाख सदुसष्ठ हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०१८-२०१९ मध्ये दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रम (TSP) केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) करिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.७४५.७८ लाख (रुपये सात कोटी पंचेचाळीस लाख अठ्याहत्तर हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

४. सदर कार्यक्रमाकरिता रक्कम रु.१११८.६७ लाखाचा खर्च " मागणी क्र. टी - ५, २५०१ विशेष ग्रामविकास कार्यक्रम, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, ०१, एकात्मिकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) महाराष्ट्र राज्य ग्रामीण आजीविका अभियाना अंतर्गत विशेष कौशल्य विकास प्रकल्पासाठी वित्तीय सहाय्य (कार्यक्रम) (केंद्र हिस्सा), ३३ , अर्थसहाय्य (२५०१ २९५३)" या लेखाशिर्षाखाली तसेच रु.७४५.७८ लाखाचा खर्च " मागणी क्र. टी - ५, २५०१ विशेष ग्रामविकास कार्यक्रम, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना,

०१, एकात्मिकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०५) आजीविका अंतर्गत कौशल्य विकासासाठी विशेष प्रकल्पावरील वित्तीय सहाय्य (महाराष्ट्र राज्य ग्रामीण आजीविका अभियान) (राज्य हिस्सा), ३३ अर्थसहाय्य (२५०१ २९३५) " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय / उपलेखाशीर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावे.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

८. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

९. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचे कडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

१०. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग शासन परिपत्रक्र दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या तपासणी सूचीतील प्रत्येक अटींची पूर्तता झालेली आहे.

११. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३९/अर्थोपाय, दिनांक २७ सप्टेंबर, २०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११९१३१८५११७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2018.11.19 13:24:37 +05'30'

**( अनिल मा. काळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) कक्ष अधिकारी (का. ६ / का.१७) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१९) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, व योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवडनस्ती.